

# सहा कावळे.

लिओ लिओन्नी

मराठी अनुवादः
फारूक एस.काझी

बालाबदूर टेकड्यांच्या पायथ्याशी एका शेतकऱ्याने गव्हाची शेती केली होती. शेताच्या कडेला असणाऱ्या झाडावर सहा कावळे गहू पिकण्याचीच वाट पाहत होते. गहू पिकताच कावळ्यांना घाबरवण्यासाठी शेतकऱ्याने शेतात बुजगावणं लावलं. पण ते लबाड कावळे त्याने थोडेच का घाबरणार होते !

लेखक लिओ लिओन्नी यांनी आपल्या नवीन नीतिकथेत कोलाजाच्या मदतीने मानव आणि प्राणी यांच्या वर्तनातील समानतेवर मार्मिक भाष्य केले आहे. मुलांना हे निश्चित आवडेल. शेवटी त्यांनी हे दाखवून दिलं आहे की, साधा सोपा उपायही खूप मोठी जादू करू शकतो.

# सहा कावळे.



लिओ लिओन्नी.
मराठी अनुवाद: फारूक एस.काझी.

बालाबदूर टेकड्यांच्या अत्यंत शांत अशा तळाकडील भागात एका शेतकऱ्याने गव्हाची लागवड केली होती. तिथली माती अत्यंत सुपीक होती आणि वसंतात जोरदार पाऊसही झालेला होता.





शेताच्या शेजारच्या झाडावर गोंगाट करणारे ते सहा कावळे नसते तर, शेतकऱ्याचे जीवन अत्यंत आनंदी आणि समाधानी झाले असते.

जसा शेतातील गहू पिकू लागला
तसं कावळे खाली उतरून येऊ
लागले आणि गव्हाचे दाणे टिपू
लागले.





शेतकऱ्याने कावळ्यांना हाकलून लावण्याचा खूपदा प्रयत्न केला.
पण त्याची पाठ वळते न वळते तोवर कावळे पुन्हा शेतात हजर झालेले असायचे.
शेवटी त्याने वैतागून शेतात बुजगावणे बसवले.



शेतात हातातील काठी फिरवणारे बुजगावणे पाहून
कावळे घाबरून गेले.
लगेच त्यांनी एका फांदीवर कोंडाळे करून खलबतं सुरु
केली.
“आपण त्याला घाबरवून सोडूया.” ते म्हणाले.
“पण कसं?”

“आपण शेताला आग लावू.” काहीजण जोरात ओरडले.
“ तसं केलं तर आपल्याला गहू खायला मिळणार नाही,
त्याचं काय?” काहींनी शंका व्यक्त केली.
त्यांच्यात बऱ्याच उपायांवर चर्चा झाली.
अखेर एक मोठा आणि भयंकर पतंग बनवण्यावर
एकमत झाले. झाडांच्या साली आणि वाळलेली पाने एकत्र
करून त्यांनी एक भयंकर कुरूप असा पतंग बनवला.





दुसऱ्या दिवशी सकाळी त्यांनी तो पतंग शेतावरून फिरवला. बुजगावण्यावर त्याचा काहीच परिणाम झाला नाही. पण शेतकरी मात्र जाम टरकला. इतका की आपल्या घरात कडी लावून लपून बसला.
“मला यापेक्षा भयंकर बुजगावणं बनवावं लागेल.” त्याने विचार केला.



लवकरच गव्हाच्या शेतात एक मोठा राक्षस दोन्ही हातात तलवारी फिरवताना दिसला.
त्याचं रागीट तोंड रेंकल्यासारखं भासत होतं.
“याने काम व्हायलाच हवं.” शेतकरी म्हणाला.



पण हे जेव्हा कावळ्यांनी पाहिलं तेव्हा त्यांनी आणखी झाडाच्या खाली,वाळलेली पाने गोळा केली आणि एक अजस्त्र आणि भयंकर पतंग बनवला. तो त्यांनी संपूर्ण शेतावरून फिरवला. शेतकरी पुरता हबकून गेला. इतका की त्याने आपल्या घरातून बाहेर येण्याचंही धाडस केलं नाही.



एका जुन्या झाडाच्या ढोलीतून एक घुबडीन हे सर्व पाहत होती.
“मला नेमकं कळेना की कोण जास्त मूर्ख आहे? शेतकरी की कावळे?” तिने विचार केला.



दुर्लक्ष होत असल्याने गव्हाचं पिक सुकून चाललंय हे घुबडीच्या लक्षात आलं.
तिने शेतकऱ्याशी बोलायचं ठरवलं.
“तुम्ही कावळ्यांशी वाटाघाटी का करत नाही.” घुबडी बोलली.
“आता त्याला खूप उशीर झालाय.”शेतकरी चिडून बोलला.
“बोलणं काय कधीही करता येऊ शकतं.” घुबडी समजुतीच्या स्वरात बोलली.





मग ती कावळ्यांकडे गेली.
“आता आम्ही काय करायला हवं?” कावळ्यांनी काळजीच्या सुरात विचारलं.
गव्हाचं पिक करपून चाललंय हे ऐकून ते गडबडून गेले होते.
“जा आणि शेतकऱ्याशी बोलून सर्व वाद मिटवून टाका.” घुबडी म्हणाली.
“शब्दांत खूप मोठी जादू असते.”



अखेर कावळे आणि शेतकरी यांनी घुबडीच्या ढोलीजवळ भेटायचे ठरवले.
बोलताना घुबडी त्यांचं निरीक्षण करत होती.
ते आधी खूप रागाने बोलले, मग थोडे समजुतीच्या स्वरात आणि शेवटी जुन्या मित्रांसारखं.

"मला तुमच्या आनंदी कलकलाटाची खूप आठवण येते." शेतकरी बोलला.
"आणि आम्हाला तुमच्या गऱ्हाची !" कावळ्यांनी कबुली दिली.
ते सर्वजण मिळून हसू लागले.

"आपण खरंतर घुबडीचे आभार मानायला पाहिजेत", शेतकरी म्हणाला.
"पण ती आहे कुठे?"
तिची ढोली रिकामी होती. त्यांनी तिला सगळीकडे शोधलं.

ते सर्वजण जेव्हा शेतात आले, तेव्हा ते
अजस्त्र बुजागावणं तिथं उभं होतं. परंतु
काहीतरी बदलल्यासारखं वाटत होतं.
अक्राळविक्राळ हसणारं बुजगावणं आता
स्मितहास्य करत होतं.
घुबडी बुजगावण्याच्या हातावर बसली होती.



“काय झालं?” सगळ्यांनी विचारलं.
“जादू!” ती गोडसं हसत म्हणाली.

समाप्त